सन २०१९-२० या मळी हंगामातील
उत्पादित मळीच्या परराज्यात / परदेशात
निर्यातीवरील बंदी उठविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमपीएल-०११९/प्र.क्र.०७/राउशु-३.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २९ जून, २०२०.

**संदर्भ :-** १)शासन निर्णय, क्र.एमपीएल-१२१३/प्र.क्र.५५९/राउशु-३, दि.४.१.२०१६.
२) शासन निर्णय,क्र.एमपीएल-०११९/प्र.क्र.०७/राउशु-३, दि.२७.१२.२०१९.

**प्रस्तावना :-**

पश्चिम महाराष्ट्रातील पूरस्थिती व मराठवाड्यातील दुष्काळ परिस्थिती विचारात घेता, मागच्या वर्षीच्या तुलनेत सन २०१९-२० यावर्षी मळीचे उत्पादन आणखी कमी होण्याची शक्यता असल्याने त्याचा परिणाम देशी / विदेशी मद्य, इ.एन.ए. तसेच, इथेनॉल निर्मिती आवश्यक असणाऱ्या मद्यार्कावर होण्याची शक्यता विचारात घेता, उपरोक्त संदर्भ क्र. २ वरील दि.२७.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, सन २०१९-२० या मळी हंगामातील उत्पादित मळीच्या परराज्यात / परदेशात निर्यातीवर दि.३० सप्टेंबर, २०२० पर्यंत बंदी घालण्यात आली आहे.

२. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी सादर केलेल्या सद्य:स्थितीदर्शक अहवालानुसार, सन २०१९-२० च्या मळी हंगामाच्या सुरूवातीस, दि. १ नोव्हेंबर, २०१९ रोजी राज्यातील साखर कारखान्यांमध्ये एकूण ३.०२ लाख मे. टन मळी शिल्लक होती. चालु वर्षी अंदाजापेक्षा जास्त म्हणजे एकूण २४.१० लाख मे. टन मळीचे उत्पादन झाले आहे. दि.०९ जून, २०२० रोजी साखर कारखान्यांकडे एकूण ८.४७ लाख मे. टन आणि राज्यातील आसवनींकडे एकूण ५.४३ लाख मे. टन मळी अशी एकूण १३.९० लक्ष मे.ट. मळी शिल्लक आहे. तसेच, साखर आयुक्तांच्या अंदाजानुसार साधारणत: सन २०२०-२१ या साखर हंगामात अपेक्षित ९५० लाख मे.टन उसाचे गाळप झाल्यास या हंगामात अंदाजे ३६-३८ लाख मे.टन मळीचे उत्पादन अपेक्षित आहे.

३. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी सादर केलेल्या चालू हंगामातील मळीचा उपरोक्त तपशिल विचारात घेता, देशात व राज्यात उद्भवलेल्या कोव्हीड-१९ या विषाणूच्या प्रादुर्भावामुळे मद्य / मद्यार्क मागणी / व्यवहार कमी झाल्याने मळीच्या उपलब्धतेमध्ये वाढ झालेली आहे. या पार्श्वभूमीवर, मळीच्या निर्यातीवरची बंदी उठविल्यास कोव्हीड-१९ या विषाणूच्या प्रादुर्भावामुळे

ठप्प झालेले मळीचे व्यवहार सुरळीत होऊन  साखर कारखान्यांकडील मळीच्या विक्रीमुळे त्यांच्या मळी साठवणूकीचा प्रश्न निकालात निघेल, प्रदुषणाचे प्रश्न निर्माण होणार नाहीत आणि मळी विक्रीसाठी भाव आल्यास कारखान्यांवर अवलंबून असलेल्या शेतकऱ्यांना त्याचा निश्चितच फायदा होईल.

४. वरीलप्रमाणे मळी निर्यातीवरील बंदी उठविल्यानंतर मळीचे अंदाजपत्रक तसेच मद्यार्काच्या उत्पादनावर व पर्यायाने पेय मद्यावरील शासन महसूलावर विपरीत परिणाम होऊ नये तसेच सॅनिटायझर उत्पादनासाठी मद्यार्क कमी पडू नये म्हणून मळी निर्यातीच्या परवानगीवर केंद्रीयरित्या नियंत्रण ठेवणे आवश्यक आहे. तसेच, मळीच्या निर्यातीमुळे राज्यातील आसवन्यांना व अन्य औद्योगिक घटकांना मळी कमी पडू नये याबाबत दक्षता घेणे आवश्यक राहील. यासाठी मळीच्या निर्यातीची केंद्रीयरित्या परवानगी देण्याचे अधिकार आयुक्त राज्य उत्पादन शुल्क यांचेकडे देणे आवश्यक आहे.

५. वरील सर्व बाबी विचारात घेता, मळीची राज्याबाहेर व परदेशातील निर्यातीवर दि.३० सप्टेंबर, २०२० पर्यंत घालण्यात आलेली बंदी उठविण्याबाबतचा, तसेच,  मळीच्या निर्यातीची केंद्रीयरित्या परवानगी देण्याचे अधिकार आयुक्त राज्य उत्पादन शुल्क यांचेकडे देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२० या चालू मळीच्या हंगामातील मळीचा सद्य:स्थितीदर्शक तपशिल आणि देशात व राज्यात उद्भवलेल्या कोव्हीड-१९ या विषाणूच्या प्रादुर्भावामुळे मद्य / मद्यार्क मागणी / व्यवहार कमी झाल्याने, मळीच्या उपलब्धतेमध्ये झालेली वाढ विचारात घेता, सन २०१९-२० या मळी हंगामातील उत्पादित मळीच्या परराज्यात / परदेशात निर्यातीवर, उपरोक्त संदर्भ क्र. २ येथील दि.२७.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, दि.३० सप्टेंबर, २०२० पर्यंत घालण्यात आलेली बंदी या आदेशाच्या दिनांकापासून तात्काळ प्रभावाने उठविण्यात येत आहे.

२. मळी निर्यातीच्या परवानगीवर केंद्रीयरित्या नियंत्रण ठेवण्यासाठी परराज्यात / परदेशात मळी निर्यातीची परवानगी देण्याचे अधिकार आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांना देण्यात येत आहेत. याबाबत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी सविस्तर कार्यप्रणाली सुनिश्चित करुन मळी निर्यातदार घटकांना निर्यातीची सत्वर परवानगी देण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक. २०२००६२९१२४८०६८६२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar
Shahaji Yadav

Digitally signed by Sudhakar Shahaji Yadav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, cn=Sudhakar Shahaji Yadav
Date: 2020.06.29 13:02:04 +05'30'

**(सु.श.यादव)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. खाजगी सचिव, विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. सर्व जिल्हाधिकारी,
८. सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
९. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
१०. निवड नस्ती.